तात्काळ / अर्थसंकल्प प्राथम्य

मार्च, २०२३ च्या अधिवेशनात सादर केलेले
सन २०२२-२३ चे खर्चाचे पूरक विवरणपत्र
तसेच, सन २०२२-२३ मधील निधी वितरण.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- १६ मार्च, २०२३.

**परिपत्रक**

सन २०२२-२३ या वर्षाचे खर्चाचे पूरक विवरणपत्र दि. २७ फेब्रुवारी, २०२३ रोजी विधानमंडळास सादर करण्यात आले. सदर पुरवणी खर्चास आता विधानसभेने मान्यता दिली आहे. दि.३१ मार्च, २०२३ रोजी संपणाऱ्या वित्तीय वर्षाच्या विनियोजनांमध्ये समाविष्ट करण्यासाठी पुरवणी विनियोजन विधेयकास मा.राज्यपालांनी संमती दिली आहे आणि ते महाराष्ट्र पुरवणी विनियोजन विधेयक, २०२३ (सन २०२३ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. १२) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग-४, दि.१३ मार्च, २०२३ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

२. सर्व मंत्रालयीन विभागांना कळविण्यात येत आहे की, ऑगस्ट, २०२२, डिसेंबर, २०२२ व मार्च, २०२३ च्या पुरवणी विनियोजन अधिनियमानुसार मंजूर झालेल्या पूरक मागण्यांच्या रकमांचे वाटप करण्यापूर्वी कार्यक्रमांतर्गत खर्चाच्या पूरक मागणीसंदर्भात (केंद्र पुरस्कृत योजना वगळून) यथास्थिती नियोजन विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाची आणि अनिवार्य खर्चाच्या पूरक मागणीसंदर्भात वित्त विभागाची मान्यता घेण्यात यावी. असे मान्यता घेण्याबाबतचे प्रस्ताव पुरवणी मागण्यांच्या मुळ धारिकेवर सादर करण्यात यावेत.

३. सन २०२२-२३ चा उर्वरित कालावधी पाहता आता **सुधारित अंदाजाच्या मर्यादेत** खालीलप्रमाणे निधी वितरणाची मर्यादा निश्चित करण्यात येत असून त्याप्रमाणे निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि सनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्यास सहमती देण्यात येत आहे :-

अ) आर्थिक वर्षाच्या उर्वरित कालावधीसाठी खालील उद्दिष्टांच्या अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत तरतूदींचा उर्वरित संपूर्ण निधी एकत्रितरित्या बीम्स प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. म्हणजेच यासाठी आता १०० % तरतूद उपलब्ध राहिल.

| | | |
|---|---|---|
| ०१-वेतन | १८- सुट्टीच्या दिवसाची भरपाई | ३६- सहायक अनुदाने (वेतन) |
| ०२- मजूरी | १९- आहार खर्च | ४५- व्याज |
| ०३-अतिकालीक भत्ता | २१- पुरवठा व सामग्री | ५१- मोटार वाहने |
| ०४- निवृत्तीवेतन विषयक खर्च | २२- शस्त्र व दारू गोळा | ५२-यंत्रसामग्री व साधनसामग्री |
| ०६-दुरध्वनी,वीज व पाणी देयक | २४- पेट्रोल, तेल व वंगण | ५५- कर्जे व आगाऊ रकमा |
| १०- कंत्राटी सेवा | २८- व्यावसायिक सेवा | ५६- कर्जाची परतफेड |
| ११- देशांतर्गत प्रवास खर्च | २९-वस्तुच्या विक्रीसाठी खरेदी | ५७- पशुधन |
| १२-विदेश प्रवास खर्च | ३०- इतर कंत्राटी सेवा | ६०- इतर भांडवली खर्च |
| १३- कार्यालयीन खर्च | ३४- शिष्यवृत्या / विद्यावेतने | ६३- आंतरलेखा हस्तांतरणे |
| १४- भाडेपट्टी व कर | ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान | ७२- यंत्रसामग्री व उपकरणे यांची देखभाल व दुरूस्ती |

ब) उर्वरित उद्दिष्टांमधील कार्यक्रमांतर्गत खर्चाचे निधी वितरणासाठी नियोजन विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाची आणि अनिवार्य खर्चाच्या निधी वितरणासाठी वित्त विभागाची मान्यता घेण्यात यावी.

४. अर्थसंकल्पीय तरतूदीत होणारी बचत महाराष्ट्र राजकोषिय उत्तरदायित्व व अर्थसंकल्पीय व्यवस्थापन नियमांतर्गत निर्धारित केलेली वार्षिक लक्षे साध्य करण्यासंदर्भात उपयुक्त ठरणार असल्याने अर्थसंकल्पीय तरतूदींच्या पुनर्विनियोजासंदर्भात प्रशासकीय विभागांनी अनिवार्य खर्चासाठी वित्त विभागाची व कार्यक्रम खर्चासाठी आवश्यकतेनुसार नियोजन विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाची मान्यता घेतल्याशिवाय निधीचे पुनर्विनियोजन करू नये. तसेच यापूर्वी निधी आहरित करून बँक/ स्वीय प्रपंजी खात्यात ठेवला असल्यास असा खर्च न होणारा निधी शासन खाती जमा करण्यात यावा.

५. प्रशासकीय विभागांना उपरोक्त मर्यादेमध्ये उपलब्ध करून दिलेला निधी त्यांच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रिय कार्यालयांना वा प्रशासकीय विभागांना वितरीत करताना सदर निधी दि. ३१ मार्च, २०२३ पर्यंत निश्चितपणे खर्च होईल याची खात्री करावी. सदर निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता त्यांच्या अधिनिस्त क्षेत्रिय अधिकारी/मंडळे/महामंडळे यांच्या बँक खात्यात, स्वीय प्रपंजी खात्यात अथवा शासकीय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही.

६. वरील प्रमाणे प्रशासकीय विभागाने निधीचे वितरण करतांना तसेच तो खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच वित्त विभागाने यापुर्वी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित निकष, वित्तीय आधिकारांचे प्रत्यायोजन व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

७. निधी वितरण तसेच पुनर्विनियोजनाबाबतच्या नस्त्या आवश्यक तेथे नियोजन विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग या विभागांच्या मान्यतेनंतर वित्त विभागास गुरुवार दि. २३ मार्च, २०२३ रोजी दुपारी २.०० वाजेपर्यंत स्वीकारण्यात येतील याची विभागाने नोंद घ्यावी. तसेच, अशा नस्यांच्या निदेशपत्रावरच “सन २०२२-२३ निधी वितरण/पुनर्विनियोजन” असे ठळक अक्षरात नमूद करावे. यानंतर अशा बाबींचे प्रस्ताव/ नस्ती वित्त विभागात कोणत्याही परिस्थितीत स्वीकारल्या जाणार नाहीत. याची विभागाने नोंद घेवून त्यानुषंगाने कार्यवाही करावी. तसेच, वित्त विभागाच्या नोंदणी शाखेमध्ये प्राप्त झालेले असे प्रस्ताव नोंदणी शाखेने तातडीने संबंधीत व्यय शाखेकडे पाठवावेत. व्यय शाखेने सदर प्रस्तावाची छाननी करून अभिप्रायासह असे प्रस्ताव शुक्रवार दि. २४ मार्च, २०२३ रोजी सायंकाळी ०४.०० वाजेपर्यंत अर्थसंकल्प शाखेत पाठवावेत.

८. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०३१६१२३९५७७१०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PANDURANG JOTIBA JADHAV

Digitally signed by PANDURANG JOTIBA JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT,
2.5.4.20=476d37b83707d4fa8d081fe85145aa8df78154c98a1889573cd2900918d397e5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A256E2285AACFD4CDF1A5A468970133F213ECC0C01D84AA031BA50479F2EEF89, cn=PANDURANG JOTIBA JADHAV
Date: 2023.03.16 12:44:45 +05'30'

**( पां. जो. जाधव )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव

२) मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव
३) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधान सभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
५) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७) सर्व सह सचिव / उप सचिव (अर्थसंकल्प शाखा), सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११०००१
९) प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१०) प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
११) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१५) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती, अर्थ-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.